**महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण-२०२५**
(Maharashtra Electric Vehicle Policy-२०२५).

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीआर-०१२५/प्र.क्र.१३/परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ मे, २०२५

**वाचा :**

१. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय, क्र. विवाधो २०१७/ प्र.क्र.१८८/ उद्योग-२, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८.
२. पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग शासन निर्णय, क्र. मइवाधो २०२१/प्र.क्र. २५/तां.क.४, दिनांक २३ जुलै, २०२१.
३. शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०३२१/प्र.क्र.४४/परि-२, दिनांक १४ जून, २०२३.

**प्रस्तावना :**

पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने दिनांक २३.०७.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण-२०२१ जाहीर केले आहे. तसेच सदर शासन निर्णयान्वये धोरणामधील विविध प्रोत्साहने व अंमलबजावणीची विभागनिहाय जबाबदारी सोपविण्यात आली असून संदर्भिय क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये परिवहन विभागास नोडल विभाग म्हणून जाहीर करण्यात आले आहे. महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण-२०२१ च्या अंमलबजावणीचा कालावधी दिनांक ३१.०३.२०२५ पर्यंत होता. सबब, दिनांक ०१.०४.२०२५ ते ३१.०३.२०३० या कालावधीकरिता महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण-२०२५ लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

"महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण-२०२५" या धोरणामध्ये समाविष्ट बाबी पुढीलप्रमाणे आहेत-

**१. दृष्टीकोन-** इलेक्ट्रिक वाहनांचे उत्पादन व वापर यास मोठ्या व्यापक प्रमाणावर चालना देऊन, चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांचा विस्तार करून आणि पर्यावरणीय शाश्वतता, आर्थिक वाढ व उर्जा सुरक्षिततेमध्ये योगदान देणाऱ्या शाश्वत आणि नाविन्यपूर्ण परिवहन उपाययोजना यांना प्रोत्साहन

देऊन इलेक्ट्रिक वाहनांच्या प्रगतीमध्ये महाराष्ट्र राज्याला भारतातील एक आघाडीचे केंद्र म्हणून स्थापित करणे.

**२. उद्दिष्टे-**

१) लक्ष्यीत प्रोत्साहन आणि पायाभूत सुविधांचा विकास करून वाहनांच्या सर्व प्रवर्गात इलेक्ट्रिक वाहनांच्या स्वीकाराला चालना देणे तसेच नाविन्यपूर्ण संशोधनाची आणि कौशल्य विकासाची जोपासना करून महाराष्ट्रातील इलेक्ट्रिक वाहन उत्पादन क्षमता मजबूत करणे.

२) शहरी व ग्रामीण भागात इलेक्ट्रिक वाहनांच्या सुरळीत परिचालनासाठी (Seamless) चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांची व्यापक उपलब्धता असण्याची खातरजमा करणे. त्यासोबतच बॅटरीच्या पुनर्चक्रण व पुनर्वापर (Battery Recycle and Reuse) करण्यावर भर देऊन अर्थव्यवस्थेस चालना देणे.

३) वाहनांच्या सायलेन्सर मधून हरितगृह वायूंचे शून्य उत्सर्जन करून स्थानिक हवेचे प्रदूषण कमी करण्यासाठी बसेस, मालवाहतूक वाहने, शहरी उपयोगिता वाहने, वाहनांचा ताफा, इत्यादी मोठ्या प्रभावी प्रवर्गावर या धोरणात लक्ष केंद्रित करणे. सार्वजनिक वाहतुकीचे विद्युतीकरण करण्यासाठी मोठी क्षमता असलेल्या व अधिक लोकसंख्या असलेल्या शहरांवर विशेष भर देणे.

४) **इलेक्ट्रिक वाहनांच्या वापरास चालना देणे :** विविध संवर्गातील वाहनांच्या खरेदी मध्ये विनिर्दिष्ट सवलती देऊन प्रवासी, व्यावसायिक, सार्वजनिक परिवहन आणि शहरी उपयोगिता वाहनांच्या संवर्गात इलेक्ट्रिक वाहनांच्या वापरात वाढ करणे.

५) **सार्वजनिक वाहतुकीच्या विद्युतीकरणास चालना देणे:** सार्वजनिक वाहतुकीच्या बसेस, सामायिक गतिशीलता ताफे आणि शहरी उपयोगिता वाहनांचे अंतर्गत ज्वलन इंजिनाकडून/पारंपारिक इंधनाचा वापर करणाऱ्या वाहनांकडून इलेक्ट्रिक वाहनाकडे संक्रमण करणे.

६) **इलेक्ट्रिक वाहनांच्या चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांचे मजबुतीकरण:** राज्याच्या शहरी व ग्रामीण भागात तसेच महत्वाच्या महामार्गावर इलेक्ट्रिक वाहने सहज उपलब्ध असण्यासाठी संपूर्ण राज्यात इलेक्ट्रिक वाहनांच्या चार्जिंगचे मजबूत जाळे विकसित करणे.

७) **इलेक्ट्रिक वाहनांचे उत्पादन करण्यासाठी अनुकूल परिस्थिती निर्माण करणे:** सवलती व धोरणात्मक पाठबळाच्या आधारे इलेक्ट्रिक वाहनांच्या उत्पादनाला प्रोत्साहन देणे, इलेक्ट्रिक वाहनांची पुरवठा साखळी मजबूत करणे, बॅटरीच्या विकासनावर लक्ष केंद्रित करणे, बॅटरीचे पुनर्चक्रण आणि त्याच्या घटकांचे उत्पादन करणे.

८) **संशोधन आणि विकासाला (R & D) प्रोत्साहन देणे :** राज्यातील इलेक्ट्रिक वाहनाच्या संशोधन आणि विकासाला प्रोत्साहन देण्यासाठी सदर क्षेत्रात नवकल्पना, कौशल्य व प्रतिभा विकसित करणे.

९) **स्वच्छ गतिशिलता संक्रमण मॉडेल (Clean Mobility Transition Model):** आर्थिक वर्ष २०३० पर्यंत महाराष्ट्र राज्यातील वाहतूक क्षेत्रातून ३२५ टन पीएम २.५ उत्सर्जने आणि १ दशलक्ष टन हरित गृह वायू (GHG) उत्सर्जने रोखण्याचे उद्दिष्ट आहे.

**३. धोरणाची उद्दिष्टे-** खालील उद्दिष्टांनुसार इलेक्ट्रिक वाहनांचे अंतर्वेशन आणि चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा विकसित करणे आवश्यक आहे :-

**तक्ता १ : धोरणात्मक उद्दिष्टे**

| अ. क्र. | वाहन प्रकार | उद्दिष्टे |
|---|---|---|
| १ | सर्व वाहने | ३० % |
| २ | इलेक्ट्रिक दुचाकी वाहने ( एल १ व एल २ ) | ४० % |
| ३ | इलेक्ट्रिक तीनचाकी वाहने (L५M) | ४० % |
| ४ | इलेक्ट्रिक तीनचाकी मालवाहू वाहने (L५N) | ३० % |
| ५ | इलेक्ट्रिक चारचाकी वाहने (M१) | ३० % |
| ६ | इलेक्ट्रिक चारचाकी मालवाहू वाहने (N१) | २५ % |
| ७ | इलेक्ट्रिक चारचाकी मालवाहू वाहने (N२, N३) | २० % |
| ८ | इलेक्ट्रिक बसेस (M२, M३) (राज्य/शहरी परिवहन उपक्रम-STU) | ४०% (सर्वात मोठ्या शहरी/नागरी समूहातील सार्वजनिक बसेस) (मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, छत्रपती संभाजीनगर व अमरावती) |
| ९ | इलेक्ट्रिक बसेस (M२, M३) ( खाजगी राज्य / शहरी परिवहन उपक्रम) | १५ % |
| १० | शेतीसाठीचे ट्रॅक्टर आणि एकत्रित कापणी यंत्रे (Integrated हार्वेस्टिंग machines ) | १० % |
| ११ | शासकीय वाहनांच्या ताफ्याचे इलेक्ट्रिक प्रकाराकडे टप्प्याटप्प्याने संक्रमण. | शहरातील सर्व नवीन प्रवासी वाहने इलेक्ट्रिक वाहने असतील |
| १२ | ६ नागरी समूहातील (मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, छत्रपती संभाजीनगर व अमरावती) परिभाषित वर्गवारीतील शहरी उपयोगिता वाहनांचे इलेक्ट्रिक वाहनामध्ये संक्रमण. | ५० % |
| १३ | ताफ्याचे परिचालक व समुच्चयकांकडून इलेक्ट्रिक वाहनांचा स्वीकार | ताफ्यातील ५० % वाहने इलेक्ट्रिक असावीत. |

| अ. क्र. | वाहन प्रकार | उद्दिष्टे |
|---|---|---|
| १४ | चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा | महामार्गांवर दर २५ किलोमीटर अंतरावर चार्जिंग सुविधा असावी. |
| १५ | शासकीय कार्यालयांची संकुले इलेक्ट्रिक वाहनांसाठी सानुकुलीत करून घेणे | प्रत्येक शासकीय कार्यालयाच्या वाहनतळाच्या जागेत किमान एक इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग सुविधा असावी. |

**४. धोरणात्मक आंतरनिरासन** -

**४.१) मागणी बाजूची आंतर निरासने** (Demand side policy intervention) -

१) राज्यामध्ये इलेक्ट्रिक वाहनांचा वापर व्यापक प्रमाणावर होण्यासाठी महाराष्ट्र शासनाकडून तक्ता क्रमांक २ मध्ये नमूद केल्यानुसार सवलती / प्रोत्साहने देण्यात येतील: -

**तक्ता २ : इलेक्ट्रिक वाहनांसाठी मागणी / प्रोत्साहने**

| **अ. क्र.** | **वाहन प्रकार** | **प्रोत्साहने मुळ किमतीच्या %** | **प्रोत्साहन मिळू शकणाऱ्या वाहनांची संख्या** | **प्रती वाहन महत्तम प्रोत्साहन ( रुपये )** |
|---|---|---|---|---|
| १ | इलेक्ट्रिक दुचाकी वाहने ( L१ व L २) | १० % | १,००,००० | १०,००० |
| २ | इलेक्ट्रिक तीनचाकी वाहने (L५M) | १० % | १५,००० | ३०,००० |
| ३ | इलेक्ट्रिक तीनचाकी मालवाहू वाहने (L ५ N) | १५ % | १०,००० | ३०,००० |
| ४ | इलेक्ट्रिक चारचाकी वाहने (परिवहनेत्तर) (M१) | १० % | १०,००० | १,५०,००० |
| ५ | इलेक्ट्रिक चारचाकी वाहने (परिवहन) (M१) | १५ % | २५,००० | २,००,००० |
| ६ | इलेक्ट्रिक चारचाकी हलके मालवाहू वाहने (N१) | १५ % | १०,००० | १,००,००० |
| ७ | इलेक्ट्रिक बसेस (M३, M४) (राज्य परिवहन उपक्रम- STU) | १० % | १५०० | २०,००,००० |
| ८ | इलेक्ट्रिक बसेस (M३, M४) (खाजगी, राज्य / शहरी परिवहन उपक्रम) | १० % | १५०० | २०,००,००० |

| अ. क्र. | वाहन प्रकार | प्रोत्साहने मुळ किमतीच्या % | प्रोत्साहन मिळू शकणाऱ्या वाहनांची संख्या | प्रती वाहन महत्तम प्रोत्साहन (रुपये) |
|---|---|---|---|---|
| ९ | इलेक्ट्रिक चारचाकी मालवाहू वाहने (N २, N ३) | १५ % | १,००० | २०,००,००० |
| १० | शेतीसाठीचे इलेक्ट्रिक ट्रॅक्टर व एकत्रित कापणी यंत्रे. | १५ % | १,००० | १,५०,००० |

*टिप- मागणी प्रोत्साहने इलेक्ट्रिक वाहनांच्या अशा उत्पादकांच्या वाहनांसाठी वैध आहेत, जे एकतर महाराष्ट्र राज्यात वाहने तयार करत आहेत किंवा महाराष्ट्र राज्यात वाहने विकण्यासाठी नोंदणीकृत आहेत. महाराष्ट्र राज्यात विक्री केलेल्या आणि नोंदणीकृत इलेक्ट्रिक वाहनांसाठी प्रोत्साहने लागू आहेत. वाहनाच्या कारखान्यातील मुल्याच्या टक्केवारीमध्ये प्रोत्साहनाचे संवितरण करण्यात येईल. अंतिम ग्राहकाला बॅटरीची मालकी हस्तांतरीत न करता खरेदी होत असलेल्या इलेक्ट्रिक वाहनाच्या खरेदीवर देखील प्रोत्साहने लागू राहतील.*

२) सदर धोरणाच्या कालावधीत राज्यात विक्री व नोंदणी झालेल्या सर्व इलेक्ट्रिक वाहनांना मोटार वाहन करातून संपूर्ण सूट मिळेल.

३) भारत सरकारच्या रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालयाच्या दिनांक १८ जून २०१९ रोजीच्या अधिसूचनेनुसार राज्यात विक्री व नोंदणी झालेल्या सर्व इलेक्ट्रिक वाहनांना नोंदणी प्रमाणपत्र जारी करण्याच्या किंवा नुतनीकरण शुल्कातून माफी देण्यात येईल.

**४.२) प्रवासी इलेक्ट्रिक वाहनांना पथकर माफ करणे** (Demand side policy intervention) –

१) सदर धोरणामुळे मुंबई-पुणे व मुंबई-नागपूर या शहरांच्या दरम्यान शाश्वत परिवहन छन्नमार्गाचे प्रात्यक्षिक दाखवणे शक्य होईल. या उपक्रमाचा एक भाग म्हणून मुंबई-पुणे यशवंतराव चव्हाण द्रुतगती महामार्ग, हिंदूहृदय सम्राट बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र समृद्धी महामार्ग या महामार्गांवर आणि अटलबिहारी वाजपेयी शिवडी-न्हावा शेवा अटल सेतूवर प्रवासी इलेक्ट्रिक वाहनांना १००% पथकर माफी देण्यात येत आहे. यासाठी माफ करण्यात येणाऱ्या पथकर माफीच्या रकमेची प्रतिपूर्ती अर्थसंकल्पीय तरतुदीद्वारे परिवहन विभागाकडून सार्वजनिक बांधकाम विभागास करण्यात येईल.

२) तसेच राज्यातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीत असलेल्या उर्वरित राज्य मार्गांवर इलेक्ट्रिक वाहनांना पथकर माफी टप्याटप्याने देण्याबाबतचा निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीकडून घेण्यात येईल.

**४.३) चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा -**

१) राज्यभरात इलेक्ट्रिक वाहनांचा स्वीकार होण्यासाठी राज्यामध्ये चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांचा भक्कम विकास करण्यात येईल. त्यामध्ये खालील आंतरनिरासनाच्या माध्यमातून राज्य व राष्ट्रीय महामार्गावर प्रत्येक २५ किमी अंतराने इलेक्ट्रिक वाहनांसाठी चार्जिंग सुविधांची उभारणी समाविष्ट असेल.

अ) तांत्रिक व्यवहार्यतेच्या अधिन राहून, राज्य व राष्ट्रीय महामार्गावरील सर्व सध्या अस्तित्वात असलेल्या व नवीन इंधन स्थानकांवर इलेक्ट्रिक वाहनांसाठी किमान एक चार्जिंग सुविधा असेल. हे साध्य होण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा परिवहन विभाग व तेल विपणन कंपन्यांमध्ये सामंजस्य करार करण्यात येईल.

ब) तांत्रिक व्यवहार्यतेच्या अधिन राहून, राज्यातील महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या सर्व बस स्थानके / बस थांब्यांवर किमान एक जलद चार्जिंग स्थानक उभारण्यात येईल.

२) महामार्गावर इलेक्ट्रिक वाहनांना उच्च ऊर्जा चार्जिंग (High Power Charging) विषयक पायाभूत सुविधांच्या सुरळीत कार्यान्वयनासाठी दिष्ट धारा ( Direct Current ) जलद चार्जिंग स्थानकांच्या स्थापनेसाठी आवश्यक असलेल्या व्यवहार्यता तफावत निधीच्या संरचित ढाचाची (Structured Framework) राज्यात स्थापना करण्यात येईल, त्याचे कार्यतंत्र पुढील प्रमाणे असेल :

**तक्ता ३ : चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांसाठी सवलती**

| **चार्जिंग स्तर** | **उर्जा श्रेणी** | **निधीची टक्केवारी** | **प्रती स्थानक कमाल मर्यादा** | **सवलत द्यावयाच्या सार्वजनिक / निम्न सार्वजनिक चार्जिंग स्थानकांची कमाल संख्या** |
|---|---|---|---|---|
| चारचाकी इलेक्ट्रिक वाहने, इलेक्ट्रिक बसेस व ट्रकसाठी चार्जिंग केंद्रात किमान ४ चार्जिंग बिंदू स्थापित असणे आवश्यक आहे. | दिष्ट धारा ( Direct Current ) ५० ते २५० किलोवॅट | १५ % पर्यंत | रुपये ५.०० लाख | १००० |

| चार्जिंग स्तर | उर्जा श्रेणी | निधीची टक्केवारी | प्रती स्थानक कमाल मर्यादा | सवलत द्यावयाच्या सार्वजनिक / निम्न सार्वजनिक चार्जिंग स्थानकांची कमाल संख्या |
|---|---|---|---|---|
| बस व ट्रक चार्जिंग स्थानकासाठी दिष्ट धारा असलेली उच्च उर्जा. चार्जिंग केंद्रात किमान २ चार्जिंग बिंदू ( charging points ) स्थापित असणे आवश्यक आहे. | दिष्ट धारा ( Direct Current ) असलेली उच्च उर्जा ( २५० ते ५०० किलोवॅट ) | १५ % पर्यंत | रुपये १०.०० लाख | ५०० |

*टिप- उपरोक्त निधीमध्ये फक्त चार्जिंग स्थानकाचा (charging station) खर्च समाविष्ट आहे, यामध्ये चार्जिंग स्थानक (charging station) स्थापित करण्यासाठी आवश्यक जमीन व अन्य अनुषंगिक खर्च समाविष्ट नाही.*

३) महामार्गावरील इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्थानके सहजगत्या ओळखू येण्यासाठी योग्य अशा सूचना फलकांचा वापर करण्यात येईल. महामार्गावरील इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग केंद्रे सहजगत्या ओळखू येण्यासाठी स्थानक चालकांनी उंच व दूरवरून सहजपणे दिसून येणाऱ्या सूचना फलकांचा उपयोग करावा.

४) एकीकृत चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा योजना विकसित व कार्यान्वित करण्यासाठी उर्जा विभाग राज्य स्तरावर शीर्ष संस्थेची ( Nodal Agency ) स्थापना करेल. शाश्वत उर्जेच्या वापरावर आधारित व बॅटरी साठवण प्रणालीच्या उपलब्धतेनुसार इलेक्ट्रिक वाहन चार्जिंग स्थानकांची वर्गवारी करण्यासाठी यथायोग्य कार्यपध्दती विकसित करणे योजनेत समाविष्ट असेल.

५) महाराष्ट्र वीज नियामक आयोगाशी सल्लामसलत करून वाहन हे इलेक्ट्रिक जाळ्याशी संलग्न होण्यासाठी पथदर्शक अभ्यास करण्यात येईल. सदर अभ्यासाच्या आधारे वाहन हे इलेक्ट्रिक जाळयाशी संलग्न होण्यासाठी ऊर्जा विभागाने आवश्यक ती नियामक चौकट आणि / किंवा मार्गदर्शक सूचना विकसित / तयार करावी / कराव्यात.

६) चार्जिंग केंद्र परीचालकाने एकात्मिक उर्जा पद्धतीचे अनुपालन करण्यासाठी सदर धोरण त्यांना प्रोत्साहन देईल. भिन्न चार्जिंग मंचांवर सांधेरहित सहयोगासाठी एकात्मिक उर्जा पद्धती हे खुले जाळे ( नेटवर्क ) म्हणून निर्धारित करण्यात आले आहे.

७) महाराष्ट्र उर्जा नियामक आयोगाच्या दिनांक २८.०३.२०२५ रोजी जारी केलेल्या आदेश क्रमांक २१७ / २०२४ नुसार चार्जिंग विषयक सुविधांना विजेबाबतचे सवलतीतील शुल्क लागू होईल.

८) इलेक्ट्रिक वाहनांच्या चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांच्या स्थापनेसाठी सुकरपणे मान्यता देण्यासाठी राज्यामध्ये कालबद्ध एक खिडकी ऑनलाईन मान्यता प्रणाली स्थापित करण्यात येईल. सदर प्रणालीत स्थानिक नागरी संस्था, नगरपालिका / महानगरपालिका, वितरण कंपन्या व अन्य संबंधित प्राधिकरणाने द्यावयाच्या मान्यता यांचे एकत्रीकरण करण्यात येईल.

**४.४) चार्जिंग सुविधा-**

१) खासगी व व्यावसायिक इमारतीत इलेक्ट्रिक वाहनांसाठी चार्जिंग स्थानकांची तरतूद करण्यासाठी सन २०१९ मध्ये भारत सरकारच्या गृहनिर्माण व नागरी विकास मंत्रालयाने बांधकाम संहिता व नगर नियोजन नियमावलीत दुरुस्त्या केल्या आहेत. सदर दुरुस्त्या रीतसर समाविष्ट करून नवीन इमारतींना त्या लागू करण्यात येतील. नगर विकास विभाग याबाबतची कार्यवाही करेल.

२) आवश्यकता भासल्यास नगर विकास विभागाने सदर मार्गदर्शक सूचना विकास नियंत्रण नियमावलीत दुरुस्ती करून समाविष्ट कराव्यात. एकदा समाविष्ट केल्यावर विहित सुरक्षा मानकांचे व खालील उपाययोजनांचे अनुपालन केल्याशिवाय ना हरकत प्रमाणपत्र जारी करण्यात येऊ नये.

अ. वाहनतळातील सर्व जागा या इलेक्ट्रिक वाहनांसाठी चार्जिंग सुविधांनी सुसज्ज असण्याच्या दृष्टीने सर्व नवीन रहिवासी इमारतींची संरचना व बांधकाम करण्यात येईल.

ब. सर्व नवीन व्यावसायिक इमारतीतील वाहनतळाच्या जागेपैकी किमान ५० % जागा ही इलेक्ट्रिक वाहनांच्या चार्जिंगसाठी योग्य असेल व त्यामध्ये भविष्यात चार्जरची उभारणी करण्यासाठी वाहनतळी तारांची रचना करण्याची व्यवस्था असेल.

क. सामाईक वाहनतळ असलेल्या सद्य व्यावसायिक इमारतीत २० % जागेत चालू स्थितीतील चार्जिंग स्थानके अस्तित्वात असणे आवश्यक आहे.

ड. प्रत्येक नवीन निवासी इमारतीत इलेक्ट्रिक वाहनांच्या सामुहिक चार्जिंगसाठी समर्पित चार्जिंग बिंदू असणे अनिवार्य असेल.

इ. गृहनिर्माण संस्थेच्या किमान ५० % सभासदांच्या मान्यतेच्या अधीन राहून व सर्व सुरक्षितता व परीचालानात्मक प्रमाणकाचे अनुपालन करून इलेक्ट्रिक वाहनांच्या सामुहिक चार्जिंगसाठी जागा देण्यात यावी.

ई. निवासी आणि व्यापारी संकुलांमध्ये वाहनतळांच्या जागेत चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांच्या सुरक्षित उभारणी व परिचालनासाठी राज्याच्या अग्नी सल्लागारांशी सल्लामसलत करून सर्वसमावेशक अग्नी सुरक्षितता मार्गदर्शक सूचना विकसित करणे.

उ. निवासी आणि व्यापारी संकुलांमध्ये वाहनतळांच्या जागेत चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांच्या सुरक्षित उभारणी व परिचालनासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळासह सर्व विशेष नियोजन प्राधिकरणाने सदर मार्गदर्शक सूचना त्यांच्या मान्यता प्रक्रियांशी संरेखीत कराव्यात.

३) एक विकसित भविष्यवेधी शाश्वत गतिशीलता परिस्थितीकी प्रकल्पाचे प्रात्यक्षिक (Demonstration of future sustainable mobility ecosystem project) म्हणून राज्यात मुंबई-पुणे यशवंतराव चव्हाण द्रुतगती महामार्ग व हिंदूहृदय सम्राट बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र समृद्धी महामार्ग विकसित करण्यात येईल. यशवंतराव चव्हाण द्रुतगती महामार्ग, अटलबिहारी वाजपेयी शिवडी-न्हावा शेवा अटल सेतू, हिंदूहृदय सम्राट बाळासाहेब ठाकरे महाराष्ट्र समृद्धी महामार्ग या महामार्गांवर सर्व प्रकारच्या वाहनांसाठी पर्याप्त प्रमाणात चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा उभारण्यात येतील. यामुळे हायड्रोजन इंधन सेलवर आधारित इलेक्ट्रिक वाहने आणि हायड्रोजन इंधन विषयक पायाभूत सुविधा उभारण्यासाठी भारत सरकारच्या प्रयत्नांना बळ मिळेल.

४) त्याशिवाय चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा मजबूत करण्यासाठी आणि इलेक्ट्रिक वाहनांतून दीर्घपल्ल्याच्या प्रवासाला पाठबळ देण्यासाठी महाराष्ट्रातील महत्वाच्या राष्ट्रीय व राज्य महामार्गांचे विद्युतीकरण करण्यात येईल. जलद चार्जिंग स्थानकांची उभारणी या विद्युतीकरण प्रक्रियेत समाविष्ट आहे. तसेच महामार्ग नियोजनाचा अविभाज्य भाग म्हणून राज्यातील सर्व नवीन हरित महामार्गावर इलेक्ट्रिक वाहनासाठी चार्जिंग सुविधा विकसित केल्या जातील.

**४.५) पुरवठा बाजूने आंतरनिरसन :-**

१) राज्यामध्ये इलेक्ट्रिक वाहनांच्या उत्पादनासाठी मजबूत व्यवस्था विकसित करण्यासाठी गुंतवणुकदारांना आकर्षित करण्याचे महाराष्ट्र शासनाचे उद्दिष्ट आहे. इलेक्ट्रिक वाहनांचे आणि त्यांच्या बॅटऱ्यांचे व अन्य घटकांचे उत्पादन करण्यासाठी राज्यात उभारलेल्या उत्पादन प्रकल्पाच्या जागेस ती उभारणाऱ्या सर्व बृहद मध्यम लघु व सूक्ष्म उद्योगांना ड + वर्गवारीचे सर्व लाभ देण्यात येतील. सदर धोरण सार्वजनिकरीत्या अधिसूचित झाल्याच्या दिनांकापासून सदर सवलती लागू होतील आणि उद्योग विभागाकडून संवितरीत करण्यात येईल व याबाबतच्या मार्गदर्शक सूचना उद्योग विभाग जारी करेल.

२) बॅटरी उत्पादन केंद्रांच्या आणि इलेक्ट्रिक वाहने चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांच्या सान्निध्यात मोक्याच्या ठिकाणी इलेक्ट्रिक वाहनांच्या पुनर्चक्रण केंद्रांच्या (Recycling Centre) स्थापनेस राज्य प्रोत्साहन देईल. अशी केंद्रे स्थापन करण्यासाठी मुंबई महानगर प्रदेश, पुणे, नागपूर व छत्रपती संभाजी नगर इत्यादी संभाव्य स्थाने आहेत.

३) नगर विकास विभागाच्या मार्गदर्शनाखाली स्थानिक नागरी संस्थांनी खालील निरासने हाती घ्यावीत.

अ. आपल्या अखत्यारीतील भागात इलेक्ट्रिक  वाहनांच्या वापरलेल्या बॅटऱ्या आणून देण्यासाठी स्थानिक नागरी संस्थांनी सोयीची स्थाने नेमून द्यावीत. यामध्ये चार्जिंग स्थानके, बॅटरी अदलाबदल केंद्रे, अधिकृत विक्रेते आणि सेवा केंद्रांचा समावेश असू शकतो.

आ. बॅटरी विलगीकरण व विल्हेवाट केंद्रे स्थापन करण्यासाठी घनकचरा प्रक्रिया व विल्हेवाट केंद्रांच्या सभोवताली असलेल्या जागा स्थानिक नागरी संस्थांनी निर्धारित करून त्या राखून ठेवाव्यात.

इ. इलेक्ट्रिक  वाहनांच्या बॅटऱ्याचे सुरक्षितपणे संकलन, वर्गीकरण व पुर्नवापर होण्याची खातरजमा करण्यासाठी स्थानिक नागरी संस्थांनी जवळपासच्या अस्तित्वातील पुर्नवापर सुविधांशी सहयोग करावा.

**४.६) संशोधन व विकसन :-**

१) इलेक्ट्रिक  वाहने, चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा, आणि हायड्रोजन तंत्रज्ञानाच्या अनुषंगाने संशोधन व विकासावर लक्ष केंद्रित करण्यासाठी किमान तीन यथोचित स्थानी सर्वोत्कृष्टता केंद्रे राज्यातर्फे स्थापन करण्यात येतील. मुंबई, नागपूर, छत्रपती संभाजीनगर इत्यादी सारख्या शैक्षणिक व संशोधन संस्था उभारणीत आघाडीवर असलेल्या शहरांमध्ये या केंद्रांची स्थापना करण्यात येईल. सदर सर्वोत्कृष्टता केंद्रात अत्याधुनिक संशोधन करून तंत्रज्ञानाचे हस्तांतरण सुविधीत होऊन निर्धारित तंत्रज्ञानाचे वेळेवर विकसन व वाणिज्यिकरण होईल.

२) संशोधन व विकसन उपक्रमांना निधी पुरविण्यासाठी मुख्यमंत्री इलेक्ट्रिक  वाहने संशोधन व विकसन अनुदान योजनेच्या अंतर्गत रुपये १५.०० कोटी रकमेचा समर्पित निधी निर्माण करण्यात येईल.

३) खालील क्षेत्रात लक्ष्यीत संशोधन व विकास करण्यास राज्य प्राधान्य देईल.

अ. पर्यायी रासायनिक बॅटरी सेल: लिथियमवरील अवलंबित्व कमी करण्यासाठी सोडियम आयन बॅटरी सारख्या अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा विकास करून उर्जा कार्यक्षमतेत सुधारणा करणे.

आ. आयातीवरील अवलंबित्व कमी करण्यासाठी आणि पुरवठा साखळीची लवचिकता वाढविण्यासाठी पॉवर इलेक्ट्रॉनिक आणि इलेक्ट्रिक वाहन पुरवठा उपकरणे यांचे स्वदेशीकरण.

इ. बॅटरी पुनर्चक्रण / पुनर्वापर तंत्रज्ञान: इलेक्ट्रिक  वाहनांच्या मूल्य साखळीच्या वर्तुळाकाराची तजवीज करण्यासाठी बॅटरीचे पुनर्चक्रण होण्यासाठी कार्यक्षम प्रणाली स्थापित करणे.

ई. कायमस्वरूपी लोहचुंबक मुक्त मोटारी : दुर्मिळ मृदा मुलद्रव्यांवरील अवलंबित्व कमी करण्यासाठी मोटारींचे विकसन करून परिव्यय प्रभाव वाढविणे.

उ. द्विदिशिक चार्जिंग (Bi-Directional Charging) व वाहन ते जाळे (Vehicle to Grid) एकत्रीकरण:- जाळ्याची स्थिरता  वाढविण्यासाठी आणि वितरीत उर्जा प्रारुपांना प्रोत्साहन देण्यासाठी वाहन ते जाळे एकत्रीकरणासह द्विदिशिक चार्जिंगला चालना देणे.

ऊ. बायोमास आधारित हरित हायड्रोजन निर्माण करणे : परिवहन क्षेत्रात निर्कार्बनीकरणाला पाठबळ देण्यासाठी बायोमासवर आधारित हरित हायड्रोजन निर्मिती ( Green Hydrogen Generation ) करण्यास प्रोत्साहन देणे.

**४.७) कौशल्य व प्रज्ञेचे विकसन :-**

१) इलेक्ट्रिक वाहन उत्पादन उद्योगाला कौशल्यपूर्ण प्रज्ञा समूह विकसित करण्यासाठी महाराष्ट्र राज्य तांत्रिक शिक्षण मंडळाने विशेष अभ्यासक्रमाची आखणी करावी. उद्योगाच्या गरजा आणि जागतिक स्तरावरील सर्वोत्तम पद्धतींचा विचार करून या अभ्यासक्रमात इलेक्ट्रिक वाहनांची संरचना, बॅटरी तंत्रज्ञान, चार्जिंग विषयक पायाभूत सुविधा, पॉवर इलेक्ट्रॉनिक आणि उर्जा व्यवस्थापनाचा समावेश करावा. तंत्रज्ञानातील प्रगतीच्या आधारे अभ्यासक्रम अद्ययावत करून आणि इलेक्ट्रिक वाहन केंद्रित कार्यक्रम स्वीकारणाऱ्या संस्थांना सवलती देण्यात येईल.

२) इलेक्ट्रिक वाहन कौशल्यांचे प्रमाणन व पारंपारिक अंतर्गत प्रज्वलन इंजिन असलेल्या वाहनांवर काम करणाऱ्या मनुष्यबळाच्या पुनर्कौशल्यनाचे कार्यक्रम विकसित करण्यासाठी राज्यात सर्वसमावेशक चौकट स्थापित करण्यात येईल.

**४.८) धोरणाचे अन्य महत्वाचे पैलू :-**

१) इलेक्ट्रिक वाहनांच्या बॅटरीच्या औष्णिक पलायीता (Thermal Runway) च्या चाचणीसाठी व प्रमाणित सुरक्षितता मूल्यमापन संचलित करण्यासाठी परिवहन विभाग वाहनांच्या स्वयंचलित चाचणी केंद्रांमध्ये आवश्यक सुविधा उभारेल.

२) उत्पादनाचे तपशील (Manufacturing Details), वाहनाचे आरोग्याची सत्कालिक स्थिती (Real-time health status), वापराचा तपशिल (Usage history) आणि आयुष्याच्या अखेरीचे निदान (End of life diagnostics) अशा महत्वाच्या परामुल्यांचा मागोवा घेण्यासाठी बॅटरीचे अंकीय पारपत्र (Battery Digital Passport) जारी करण्याची पद्धत राज्यात सुरु करण्यात येईल.

३) सर्व स्थानिक नागरी संस्थांना PM e-Drive योजनेत सहभागी होण्यासाठी प्रोत्साहन देण्यात येत आहे. PM e-Drive योजनेत समाविष्ट असलेल्या मुंबई आणि पुणे या शहरांनी इलेक्ट्रिक वाहन धोरणाच्या अंतर्गत सवलती दावित करण्यापूर्वी PM e-Drive योजनेतील सवलतींचा लाभ घ्यावा.

४) भारत सरकार तर्फे राबविण्यात येणाऱ्या PM e-Drive योजनेच्या व्यतिरिक्त उपरोक्त प्रोत्साहने असतील.

५) वाहनाच्या मूळ उपकरणांचे उत्पादक मुलभूत मागणी प्रोत्साहनांचा लाभ घेतील आणि वाहन खरेदी करताना सदर उत्पादक सदर प्रोत्साहने ग्राहकांच्या नावे हस्तांतरीत करतील.

६) प्रोत्साहनांच्या संवितरणात पारदर्शकता असण्यासाठी आणि लाभार्थ्यांना वेळेत प्रोत्साहने प्राप्त होण्यासाठी ऑनलाईन संकेतस्थळाद्वारे प्रोत्साहनांचे संवितरण करण्यात येईल.

७) इलेक्ट्रिक वाहनांवर केंद्रित जनजागृती कार्यक्रम राज्यातर्फे राबविण्यात येतील. या कार्यक्रमात इलेक्ट्रिक वाहनांची सुरक्षितता, इलेक्ट्रिक वाहनांचे लाभ, इलेक्ट्रिक वाहनाची मालकी / खरेदी करण्यासाठी एकूण खर्च, आणि चार्जिंग स्थानकासाठी आवश्यक पायाभूत सुविधा इत्यादी विषय समाविष्ट असतील.

**५. धोरण कार्यान्वयन यंत्रणा :-**

१) महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण २०२५ कार्यान्वित करून त्यावर देखरेख ठेवण्यासाठी व मार्गदर्शन करण्यासाठी खालील सुकाणू समिती गठीत करण्यात येत आहे.

**तक्ता ४:सुकाणू सामिती**

| अ. क्र. | अधिकारी / सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, परिवहन व बंदरे विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (ऊर्जा) उद्योग, उर्जा, कामगार आणि खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नगर विकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (उद्योग) उद्योग, उर्जा, कामगार आणि खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ७ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नगर विकास-२, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ८ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ९ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| १० | उद्योगातील नामनिर्देशित प्रतिनिधी आणि / किंवा तज्ञ (कमाल ३ सदस्य) | सदस्य |
| ११ | परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य सचिव |

२) धोरणाच्या अंमलबजावणीचा आढावा घेण्यासाठी आणि महत्वाचे अडथळे दूर करून आवश्यक तेथे सुधारणा करण्यासाठी सुकाणू समितीची बैठक आयोजित करण्यात येईल.

३) हायड्रोजन इंधन सेल यासारख्या नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानावर धावणाऱ्या वाहनांची लोकप्रियता वाढेल आणि ती सहजपणे उपलब्ध होतील तेव्हा त्यांना देखील सवलती देण्याबाबत सुकाणू समिती विचार करेल. सुकाणू समिती गरजेनुसार प्राधान्य क्षेत्रासाठी उपसमित्या किंवा कार्यगट गठीत करेल.

४) सदर धोरणाच्या अनुषंगाने ऊर्जा विभाग, नगर विकास विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, उद्योग विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कौशल्य, रोजगार, उद्यमशीलता आणि नवोन्मेष विभाग व इतर संबंधित विभाग त्यांच्याशी निगडीत असलेल्या बाबी/तरतुदींच्या संदर्भात सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासन निर्णय/नियमावली जारी करतील.

५) महाराष्ट्र राज्य इलेक्ट्रिक वाहन कक्ष सुकाणू समितीला पाठबळ पुरवेल.

६) महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण २०२५ अंतर्गत विविध सवलती व अंमलबजावणी या अंतर्गत विविध जबाबदाऱ्या खालील प्रमाणे:

**तक्ता ५ : संबंधित विभाग**

| अ. क्र. | धोरणात्मक आंतरनिरासाने | संबंधित शासकीय विभाग |
|---|---|---|
| १ | मागणीच्या बाजूने आंतरनिरासाने | • परिवहन विभाग |
| २ | चार्जिंग विषयक पायाभूत सुविधांचा विकास | • परिवहन विभाग<br>• उर्जा विभाग<br>• नगर विकास विभाग<br>• सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ३ | पुरवठ्याच्या बाजूने आंतरनिरासाने | • उद्योग विभाग<br>• नगर विकास विभाग |
| ४ | संशोधन व विकास | • परिवहन विभाग<br>• उद्योग विभाग<br>• उर्जा विभाग |
| ५ | कौशल्य व प्रतिभा विकसन | • उच्च व तंत्र शिक्षण विभाग<br>• कौशल्य, रोजगार, उद्यमशीलता आणि नवोन्मेष विभाग |

३. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाने दिनांक २९.०४.२०२५ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०५२३१८३४००८२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA
MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2025.05.23 18:50:56 +05'30'

**(राजेंद्र होळकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. सभापती, विधान परिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
५. मा. अध्यक्ष, विधान सभा, यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
६. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई-३२.
९. सर्व विधान मंडळसदस्य, विधान भवन, मुंबई.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. अपर मुख्य सचिव (नगर विकास-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१७. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. प्रधान सचिव (नगर विकास-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२१. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२२. सचिव, वित्त (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

